संरक्षित वनांचे क्षेत्रालगतच्या गावातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याकरिता अनुदानाचे वाटप. सन २०१४-१५

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफडीएम-२०१४/प्र.क्र.१७७/फ-२**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
तारीख: **०२ फेब्रुवारी, २०१५**

<u>वाचा</u> :-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि.१०.०७.२०१२
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि.०८.०१.२०१३
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/इए//यो/नबाप्र/प्र.क्र.२१/६३०/(१४-१५), दि३०.०७.२०१४..
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१४/प्र१७७.क्र./फ-२, दि११.०९.२०१४
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. पूरक-२०१४/प्र.क्र.५८९/अर्थसंकल्प-३, दि. ०१.०१.१५
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि. ०२.०१.१५

<u>प्रस्तावना</u> :-

सन २०१४-१५ करिता ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षांतर्गत ५०-इतर खर्च या उद्दिष्टाअंतर्गत एकूण रु.६६०.९६ लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्याच्या ७० % च्या मर्यादेत रु.४६३.४३ इतका नियतव्यय सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पिय अंदाज (White Book) नुसार अर्थसंकल्पित करण्यात आलेला होता.

२. याअनुषंगाने, सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील गावाचे सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस / बायो गॅस पुरवठा करण्याकरिता संदर्भ क्र.५ वरील दि.११.०९.२०१४ च्या शासन निर्णयान्वये एकूण रु.२७७.६० लक्ष इतका निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरित करण्यात आलेला आहे.

३. तद्नंतर सदर लेखाशिर्षाअंतर्गत विनाअर्थसंकल्पित असलेला निधी अर्थसंकल्पित करण्याकरिता सन २०१४ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये सादर केलेल्या पुरक मागणीच्या प्रस्तावांना विधानमंडळाची मान्यता मिळालेली असून, त्यासंदर्भात वित्त विभागाने संदर्भ क्र.५ अन्वये दि.०१.०१.२०१५ रोजी परिपत्रक निर्गमित केलेले आहे.

४. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.७ वरील दि.०२.०.२०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१४-१५ च्या उर्वरित कालावधीकरिता योजनांतर्गत योजनांकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ६० टक्के मर्यादेत रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करता येईल अशा सूचना दिलेल्या आहेत. त्याअनुषंगाने संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस पुरवठा करणे या योजनेसाठी ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत ५०- इतर खर्च या उद्दिष्टाखाली मंजूर नियतव्यय रु.६६०.९६ लक्षच्या अनुषंगाने रु.२७७.६० लक्ष इतकी रक्कम वितरीत केल्यानंतर अर्थसंकल्पित रक्कमेच्या ६० टक्के मर्यादेत निधी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.४ वरील दि.३०.०७.२०१४ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव विचारात घेता तसेच वित्त विभागाने दि.०२.०१.२०१५ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणाकरिता प्रस्तावांतर्गत **रु.६६०.९६ लक्ष रक्कमेच्या प्रस्तावापैकी रु.२७७.६० लक्ष रक्कम वितरीत केल्यानंतर अर्थसंकल्पित निधीच्या ६० % टक्के मर्यादेत उर्वरित रु.११९.६२४ लक्ष (५० इतर खर्च) इतका निधी** प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्यास व बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील अनुदान खर्च करतांना या विभागाच्या दि.११.०९.२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्ती यांची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

७. उपरोक्त योजनेचा खर्च हा मागणी क्र.सी-७, प्रधानशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्य जीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना योजना, (११) (१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत ५०- इतर

खर्च या उद्दिष्टाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४९/अर्थ-६, दि.३०.०१.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/ २००८/विनियम, दि.१५.०५.२००९ भाग पहिला उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०२१७३३१६५८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.02.02 17:56:00 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक,
५) सर्व मुख्य वनसंक्षक (प्रादेशिक) / (वन्यजीव)
६) सर्व वनसंरक्षक / सर्व उप वनसंरक्षक (मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) यांचेमार्फत)
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
११) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१२) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२